मौजे धारवंटा ता. गेवराई जि. बीड या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः पापुयो-१२/२०१४/प्र.क्र.२२६/पापु-१८

मंत्रालय,मुंबई-४०००३२

तारीख: ११ सप्टेंबर,२०१४

**वाचा -**

१) शासन निर्णय क्र.ग्रापापु-११०९/१०४ अ/पापु-०७, दि.१७.०३.२०१०.

२) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१२१३/प्र.क्र.३५/पापु-०७, दि.१६ जुलै, २०१३.

३) शासन निर्णय ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.०९/१०/२०१३

४) शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा बीड, यांचे पत्र क्र./ग्रापापुवि/तांशा-२/ कावि/ २१५०/ दि.०६/०९/२०१४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -**

मौजे धारवंटा ता. गेवराई जि. बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास ग्रामपंचायत धारवंटा यांनी ठराव क्र. ०२ दि. २६/०१/२०११ नुसार प्रस्तावित केला होता. योजनेचा दरडोई खर्च वाढल्यामुळे सदर योजनेचा प्रस्ताव औरंगाबाद जिल्हा परिषदेने शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. वाढीव दरडोई खर्च असलेल्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मौजे धारवंटा ता. गेवराई जि. बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.२८३४.८५/- एवढया दरडोई खर्च असलेल्या रु. ४९.९५ /- लक्ष (अक्षरी रु. एकोणपन्नास लाख पंच्यान्नव हजार फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** मौजे धारवंटा ता. गेवराई जि. बीड पाणी पुरवठा योजनेच्या वित्तीय आकृतीबंधातील शासकीय अनुदान तसेच लोकवर्गणी हिसा संदर्भाधीन शासन निर्णक्र क्र.४ मध्ये नमुद केल्याप्रमाणे राहिल.

**३.** सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरीत्या पुर्ण झालेली आहे, याची खात्री ग्रामपंचातीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.

२. योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी येणारा खर्च भागविण्याकरीता सबंधीत ग्रामपंचायतीने योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी. पाणी पट्टीचे दर किमान १२००/- रु. प्रतिघरटी आकारावे व योजनेची देखभाल दुरुस्ती करावी त्यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

३. योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. तसेच योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

४. प्रचलित धोरणानुसार हगणदारीमुक्तीचे अभियान राबविणेत यावे.

५. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६. दरडोई खर्चाचे निकषात योजना नसल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत योजनेचे काम मंजूर किंमतीतच पुर्ण करावे. त्यासाठी कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने कार्यवाही करावी.

७. ज्याप्रकरणी जलसंपदा विभागाची पाणी उचलण्याची परवानगी आवश्यक आहे, त्याप्रकरणी परवानगी/ आरक्षण प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे काम सुरु करु नये. तसेच उद्भवामधून आवश्यक पाणी उपलब्ध होईल याची खात्री केल्यावरच योजनेच्या निविदा बोलविण्यात याव्यात.

८. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उदभव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

९. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. शासनाच्या परवानगी शिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नयेत.

१०. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

११. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची तसेच दिनांक १७.३.२०१० च्या शासन निर्णयातील अटींची पुर्तता करण्यात यावी.

**४.** या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११५५०३३५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DESHMUKH DILIP P

Digitally signed by DESHMUKH DILIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=DESHMUKH DILIP P
Date: 2014.09.11 17:17:51 +05'30'

( दि.प्र.देशमुख )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
४. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
५. विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, औरंगाबाद.
६. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
७. जिल्हाधिकारी, बीड
८. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, बीड
१०. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
११. मुख्य अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा.योजना,ठाणे.
१२. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा बीड
१३. अधिक्षक अभियंता,भारत निर्माण कक्ष,विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद.
१४. अधिक्षक अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा. योजना मंडळ, औरंगाबाद.
१५. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, बीड
१६. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१७. महालेखापाल,महाराष्ट्र-२,औरंगाबाद (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).

१८. मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.

१९.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. १,४,५,६,९,१३ व १८.

२०.निवडनस्ती पापु-१८,पा.पु.व स्व.वि.मंत्रालय,मुंबई.